**राज्य माहिती आयोगाच्या नागपूर खंडपीठातील श्रीमती क.अ.जोशी, सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१९/प्र.क्र.११३/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १३ ऑक्टोबर, २०२०

वाचा :- १) समक्रमांकाचे, दिनांक १९-०९-२०१९ चे शासन आदेश
२) राज्य माहिती आयोग, नागपूर याचे क्र.रामाआ/प्रतिनियुक्ती/प्र.क्र.०५/२०१५/आस्था/१८११, दिनांक १५-०६-२०२० चे पत्र

**शासन आदेश**

श्रीमती क.अ.जोशी, सहायक कक्ष अधिकारी, या प्रतिनियुक्तीने राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर यांच्या कार्यालयात कार्यरत असून त्यांच्या प्रतिनियुक्तीस ४ वर्षाचा कालावधी पुर्ण झाल्यामुळे संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक १९-०९-२०१९ च्या आदेशान्वये ५ व्या वर्षासाठी (दिनांक २७-०८-२०१९ ते २६-०८-२०२० पर्यंत) **फक्त एक वर्ष** अंतिम मुदतवाढ देण्यात आली होती. सदरहू आदेशातील परि. ६ मध्ये असे नमूद करण्यात आले होते की, श्रीमती जोशी यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ अंतिम स्वरुपाची असून त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा राज्य माहिती आयोग, खंडपीठ नागपूर यांनी या विभागाकडे सादर करु नये. श्रीमती जोशी यांचा ५ व्या वर्षासाठी प्रतिनियुक्तीचा कालावधी दिनांक २६-०८-२०२० रोजी संपुष्टात आला आहे. तथापि श्रीमती जोशी या दिनांक २७-०८-२०२० किंवा आज दिनांकापर्यंत त्यांच्या मूळ विभागात (सामान्य प्रशासन विभागात) रुजू झाल्या नाहीत.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

क) परि.क्र ५(अ) (३) पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे.:-

परि.क्र. ५(अ) (३):- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा. परंतु चार वर्षाचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर आणखी एक वर्षासाठी म्हणजेच ५ व्या वर्षासाठी मुदतवाढ द्यावयाची झाल्यास मा. मुख्यमंत्री यांची विनिर्दिष्टपणे मान्यता घेण्यात यावी. ५ वर्षाचा कालावधी संपल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ अनुज्ञेय राहणार नाही.

३. वर परिच्छेद २ मधील शासन निर्णयातील तरतूदीनुसार श्रीमती क.अ.जोशी, सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ येथील प्रतिनियुक्तीवरील सेवा संपुष्टात आणण्यात येत असून त्यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करुन त्यांच्या मुळ विभागास उपलब्ध करुन देण्यात येत आहे. श्रीमती जोशी यांना दिनांक १५-१०-२०२० (म.नं.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्रीमती जोशी यांनी प्रत्यावर्तनानंतर त्यांच्या मुळ विभागात (सामान्य प्रशासन विभागात) तात्काळ रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१३१५३७५७५९०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VRISHALI VINOD BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administrative Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba5579800452b60209, serialNumber=6b870a94454e2b13ee0959c3370d5d53d60a17d4b6d3ed6077e40a0f53e7a053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2020.10.13 15:39:24 +05'30'

**(वृषाली वि. भिंगार्डे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**श्रीमती क.अ.जोशी,सहायक कक्ष अधिकारी, राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, नागपूर.**

**प्रत,**

१. सचिव, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र, नवीन प्रशासकीय इमारत, १३ वा मजला, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
त्यांना विनंती करण्यात येते की, सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना मंत्रालयात रूजू होण्यासाठी तत्काळ कार्यमुक्त करण्याबाबतच्या सूचना आपल्या स्तरावरुन संबंधितांना देण्यात याव्यात.
२. उप सचिव, राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ, प्रशासकीय इमारत क्र.२, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४०००१.
३. सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
त्यांना विनंती करण्यात येते की श्रीमती जोशी यांना एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येऊन त्यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करण्यात आल्यामुळे, राज्य माहिती आयोग, नागपूर खंडपीठ यांनी त्यांना कार्यमुक्त करावे याबाबत त्या कार्यालयाकडे पाठपुरावा करावा.
४. उप सचिव (का.क्र.६), सामान्य प्रशासन विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयसमोर, मुंबई ४०० ०३२.
५. कोषागार अधिकारी, नागपूर, प्रशासकीय इमारत आवार, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४०००१.
६. साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).